**मौजे रानमळा,ता.गेवराई,जि.बीड या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः क्र. पापुयो २०१३/प्र.क्र.२७/पापु १८**
**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मुंबई-४०० ०३२**
**तारीखः २४ मार्च,२०१५**

**वाचा -**

१) ग्रामपंचायत रानमळा ता. गेवराई,जि.बीड ग्रामसभा ठराव दि.२७/०२/२००९
२) कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद बीड यांचे दि.२७/०२/२०१२
३) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद बीड यांचे पत्र क्र. ग्रापापुवि/जिपबी/तांशा-५/०००३८१/दि.२२/१०/२०१२

**प्रस्तावना -**

मौजे रानमळा,ता.गेवराई,जि.बीड या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.२६.४८ लक्ष (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.१ येथील ग्रामसभा ठरावाद्वारा प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापी योजनेच्या खर्चात काही अपरिहार्य कारणामुळे वाढ झाली. त्यामुळे कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद बीड यांनी प्रस्तुत योजनेस संदर्भाधिन पत्र क्र.२ अन्वये सुधारीत तांत्रिक मान्यता दिली. यास्तव प्रस्तुत योजनेचा मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद बीड यांचेकडून संदर्भाधिन पत्र क्र. ३ अन्वये प्राप्त झालेल्या **रु.४२.७० लक्ष (ढोबळ)** किंमतीच्या मौजे रानमळा,ता.गेवराई,जि.बीड या नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अदांजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय -

मौजे रानमळा,ता.गेवराई,जि.बीड या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.४२.७० लक्ष (ढोबळ) (बेचाळीस लक्ष सत्तर हजार फक्त) एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास** पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

## अटी

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित कामे ६ महिन्यात पूर्ण करून योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

२. या योजनेच्या सुधारीत तांत्रिक मान्यतेच्या आदेशात नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद बीड यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी ,योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी ग्रामपंचायतीने वाढ करावी.

७. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुर्नसुधारित करण्यात येऊ नये.योजना पुर्नसुधारीत केल्यास याची जबाबदारी संबधित जिल्हा परिषदेची राहील.

८. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

२. या योजनेवर सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु.१६.२२ लक्ष (रु. सोळा लक्ष बावीस हजार फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषद बीड यांना उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३३४/१४४३,दि.५/१२/२०१३ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ ११२/व्यय-३,दि.२७/०२/ २०१५ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२४११५२५३३९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramdas Malhari Ghadge

Digitally signed by Ramdas Malhari Ghadge
DN: CN = Ramdas Malhari Ghadge, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.03.24 12:03:12 +05'30'

**( रा.म.घाडगे)**
**अवर सचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
३) जिल्हाधिकारी, बीड.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड
५) वरिष्ट भुवैज्ञानिक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, बीड.
६) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
७) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई.
८) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ना.व ग्रा.योजना विभाग,बीड.
९) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बीड.
१०) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२) कार्यासन क्र.पापु-०४,०६,०७,०९,१३ व कार्यासन पापु-१७, पा. पु. व स्व. वि.मंत्रालय,मुंबई-३२.
१३) निवडनस्ती कार्यासन पापु-१८.